**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत “Establishment of Model Genome Club at Dr.Balasaheb Sawant Konkan Krishi Vidyapeeth, Dapoli” या रुपये ४३.९० लाख निधी रक्कमेच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी ,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि-११२३/प्र.क्र.३२/७-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ मार्च, २०२३.

**संदर्भ:**-१.राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या ३१ व्या बैठकीचे इतिवृत्त-शासन पत्र जा.क्र.आरकेव्ही-२०२२/प्र.क्र.२२७/१४-अे, दि.०६/०१/२०२३.
२.संचालक(संशोधन), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे पत्र जा.क्र. मकृप/संशोधन/राकृवियो-प्र.मा./प्र.क्र.२२३/३७५/२०२३, दि.०६/०२/२०२३.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या ३१ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या दि.२३/११/२०२२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत “Establishment of Model Genome Club at Dr.Balasaheb Sawant Konkan Krishi Vidyapeeth, Dapoli” हा प्रकल्प डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली येथे सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात राबविण्यास मान्यता प्रदान केली आहे. या प्रकल्पास राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्याच्या स्वरूपात रू.४४.०० लाख निधी दोन वर्षांच्या कालावधीसाठी उपलब्ध करून दिला जाणार आहे. त्यानुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी रू.४४.०० लाख नियतवाटप मंजूर करण्यास मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार संचालक (संशोधन), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत “Establishment of Model Genome Club at Dr.Balasaheb Sawant Konkan Krishi Vidyapeeth, Dapoli” हा प्रकल्प डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली येथे राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत Establishment of Model Genome Club at Dr.Balasaheb Sawant Konkan Krishi Vidyapeeth, Dapoli हा प्रकल्प डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली येथे राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्पासाठी लागणाऱ्या रु.४३,९०,०००/- (अक्षरी रुपये त्रेचाळीस लक्ष नव्वद हजार फक्त) इतक्या निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर प्रकल्पाच्या दोन वर्षाच्या खर्चाचा तपशिल सोबतच्या "परिशिष्ट अ" नुसार राहील.

४. सदर प्रकल्प केंद्र शासनाद्वारे निर्गमीत राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली येथे राबविण्यात येईल.

५. या प्रकल्पाची अंमलबजावणी संचालक (संशोधन), डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे संनियंत्रणाखाली कृषि विभागामार्फत करण्यात यावी व संचालक (संशोधन), डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांनी प्रकल्पाचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घ्यावी. त्याप्रमाणे सदर योजनेतील निधी खर्चाचे लेखा परिक्षण उपयोगिता प्रमाणपत्रे राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना वेळोवेळी सादर करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३०३१६३६२५९५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: CN = MITALI KALPESH CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2023.03.03 16:40:36 +05'30'

**( मिताली चौधरी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषी),मंत्रालय, मुंबई -३२.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

३. मा.प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई -३२.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,पुणे.
५. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन, पुणे.
६. कुलगुरु/कुलसचिव, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
७. संचालक (संशोधन), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
८. संचालक(संशोधन), डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
९. सर्व संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ), मुंबई /नागपूर.
१२.संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती).
१३.सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
१५.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१७.राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८.निवडनस्ती.

## परिशिष्ट "अ"

**शासन निर्णय क्रमांक : कोकृवि-११२३/प्र.क्र.३२/७-अे, दि. ०३ मार्च, २०२३ सोबतचे परिशिष्ट**

(रु.लाखात)

| तपशील | सन २०२२-२३ (एकूण किंमत) | सन २०२३-२४ (एकूण किंमत) | प्रकल्प एकूण किंमत | रा.कृ.वि.यो अंतर्गत प्रकल्पास मंजूर निधी (१००%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४(२+३) | ५ |
| अ) अनावर्ती निधी (उपकरणे व मालमत्ता) | | | | |
| १)संगणक ( मल्टीमीडिया ) (०२) | २.० | - | २.० | २.० |
| २)एलसीडी प्रोजेक्टर (०१) | १.५ | - | १.५ | १.५ |
| ३)इंटरएक्टिव्ह इलेक्ट्रॉनिक बोर्ड (०२) | ३.० | - | ३.० | ३.० |
| ४)डिस्प्ले पॅनेल / बोर्ड (१०-१५) | २.० | - | २.० | २.० |
| ५)फर्निचर आणि फिक्स्चर | ३.० | - | ३.० | ३.० |
| ६)रेफ्रिजरेटर, टीव्ही, वॉटर कुलर (प्रत्येकी ०१) | २.० | - | २.० | २.० |
| **एकूण (अ)** | **१३.५** | - | **१३.५** | **१३.५** |
| **ब) आवर्ती निधी** | | | | |
| १)प्रोजेक्ट असोसिएट -२ (रु.२००००/प्रत्येकी महिना) | ४.८ | ४.८ | ९.६ | ९.६ |
| २)तांत्रिक मदत - २ (रु.१०,०००/प्रत्येकी महिना) | २.४ | २.४ | ४.८ | ४.८ |
| ३)विविध कार्यक्रम आयोजित करण्यासाठी ऑपरेशनल खर्च व इतर विविध खर्च इ. | ५.० | ५.० | १० | १० |
| ४)प्रशिक्षक आणि तज्ज्ञांसाठी प्रवास खर्च, शेतकरी/समाजासाठी मानधन आणि सन्मान पुरस्कार. | ३.० | ३.० | ६.० | ६.० |
| **एकूण (ब )** | **१५.२** | **१५.२०** | **३०.४०** | **३०.४०** |
| **एकूण ( अ + ब )** | **२८.७०** | **१५.२०** | **४३.९०** | **४३.९०** |
| **एकूण निधी - रु.४३.९० लक्ष (अक्षरी रुपये त्रेचाळीस लक्ष नव्वद हजार फक्त)** | | | | |

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: CN = MITALI KALPESH CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2023.03.03 16:40:57 +05'30'

**( मिताली चौधरी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन